सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षातील
अर्थसंकल्पीय अनुदाने - सहा शासकीय
ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना देण्यात यावयाच्या
अनुदानाचे वाटप
(पहिला हप्ता - एप्रिल व मे, २०११)

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास व जलसंधारण विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- अनुग्रा २०११/प्र.क्र.५८/योजना-४**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- २८ एप्रिल, २०११.**

**संदर्भ:-** १. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्रमांक प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र.८४५/०९, दि. १७.०९.१९९३.
२. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३.९.१९९८.
३. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मुख्य लेखाशिर्ष मागणी क्र. एल ३ "२४१५ - (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, संकेतांक क्रमांक २४१५ ०६२ ४" ३१ सहायक अनुदान (वेतनेतर), ३६ सहायक अनुदान (वेतन) या लेखाशिर्षाखाली ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी (जि. पुणे), कसबाबावडा, (जि.कोल्हापूर), जालना, परभणी, बुलढाणा व सिंदेवाही (जि. चंद्रपूर) यांना सन २०११-१२ या आर्थिक वर्षाकरिता वित्त विभागाने एकूण रु.३,४०,००,०००/- (अक्षरी रु.तीन कोटी चाळीस लाख फक्त) एवढी तरतूद अर्थसंकल्पात केली आहे. सदर तरतूद चालू आर्थिक वर्षामध्ये रु२,८०,००,०००/- (अक्षरी रु.दोन कोटी एंशी लाख फक्त) वेतनासाठी व रु.६०,००,०००/- (रु.साठ लाख फक्त) वेतनेतर खर्चासाठी विभागून देण्यात यावी, असे वित्त विभागाने सूचित केले आहे. वेतनेतर खर्चामध्ये प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, पाहुणे व्याख्याता मानधन, भोजन भत्त्यावरील खर्च इत्यादी बाबींचा समावेश आहे.

२. सन २०११-१२ या आर्थिक वर्षाच्या एप्रिल व मे, २०११ या पहिल्या दोन महिन्यांच्या कालावधीतील स्थायी खर्च भागविण्यासाठी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) रु.५६,६८,०००/- (रु.छप्पन्न लाख अडुसष्ट हजार फक्त) अनुदान उपलब्ध करुन दिले आहे. त्यानुसार

वरील सहा शासकीय ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना एप्रिल व मे २०११ या दोन महिन्यांसाठी सदर अनुदान या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टात नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यात येत आहे.

३. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण ११९८/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८ व शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण २०००/ प्र.क्र.८५९ /४४, दिनांक १२ जून, २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुषंगाने सर्व संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांनी सदर प्रशिक्षण केंद्रांना अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

४. विभागीय आयुक्त कार्यालयाने ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांना दरमहा अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. मात्र सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांनी वेतन/वेतनेतर खर्चाकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे. याची पूर्व सूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/वेतनेतर खर्चाकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्व सूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशिक्षण केंद्रांच्या प्राचार्यांची असेल.

५. हा खर्च मागणी क्र.एल ३,"२४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण" (पी) (०३) (०२) ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र संकेतांक क्र. (२४१५ ०६२ ४) ३६, सहाय्यक अनुदाने (वेतन) व ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा आणि तो या वर्षी लेखाशिर्षातर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्च पडतो आहे या बाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे.

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई आणि/किंवा महालेखापाल

(लेखापरिक्षा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबधित कार्यालय/प्रशिक्षण केंद्र संपूर्ण मदत/सहकार्य करील.

७. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग-३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( संजय गांगुर्डे )
कार्यासन अधिकारी,

**प्रत,**

विभागीय आयुक्त, पुणे, नागपूर, अमरावती, औरंगाबाद (प्रत्येकी २ प्रती)
उप आयुक्त (आस्था) विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे, नागपूर, अमरावती, औरंगाबाद.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, कोल्हापूर, बुलढाणा, जालना, परभणी, चंद्रपूर
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१, मुंबई
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे
उपमहासंचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा) बाणेर रोड, पुणे
वित्त विभाग, कार्यासन क्र. अर्थसं-१७/व्यय-१५
प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, मांजरी फार्म, पुणे/कसबा बावडा, कोल्हापूर/ जालना/परभणी/सिंदेवाही, चंद्रपूर/बुलढाणा
कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ जादा प्रतिसह)
निवड नस्ती का. क्र. योजना-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग

**शासन निर्णय क्रमांक - अनुग्रा २०११/प्र.क्र.५८/योजना-४, दिनांक:- २८ एप्रिल, २०११ चे परिशिष्ट**

| ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्रांचे नांव | पहिल्या हप्त्याचे प्रस्तावित वितरण ( रुपये हजारात ) | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | एप्रिल, २०११ | | मे, २०११ | | एकूण |
| | वेतनेत्तर | वेतन | वेतनेत्तर | वेतन | |
| मांजरी फार्म, पुणे | ८५ | ३८९ | ८५ | ३८९ | ९४८ |
| कसबाबावडा, कोल्हापूर | ८३ | ३८९ | ८३ | ३८९ | ९४४ |
| **विभागीय आयुक्त, पुणे** | **१६८** | **७७८** | **१६८** | **७७८** | **१८९२** |
| जालना | ८३ | ३८९ | ८३ | ३८९ | ९४४ |
| परभणी | ८३ | ३८९ | ८३ | ३८९ | ९४४ |
| **विभागीय आयुक्त,औरंगाबाद** | **१६६** | **७७८** | **१६६** | **७७८** | **१८८८** |
| सिंदेवाही, जिल्हा चंद्रपूर | ८३ | ३८९ | ८३ | ३८९ | ९४४ |
| **विभागीय आयुक्त, नागपूर** | **८३** | **३८९** | **८३** | **३८९** | **९४४** |
| बुलढाणा | ८३ | ३८९ | ८३ | ३८९ | ९४४ |
| **विभागीय आयुक्त, अमरावती** | **८३** | **३८९** | **८३** | **३८९** | **९४४** |
| **एकूण** | **५००** | **२३३४** | **५००** | **२३३४** | **५६६८** |